**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा)**
**मधील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या.-ज्येष्ठ अधिव्याख्याता**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३११८/प्र. क्र. १०९/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १० ऑगस्ट, २०१८

वाचा:- शा.शि.व क्री. वि., शासन निर्णय क्र. ईएसटी-३९१७/प्र.क्र.४६/प्रशा-२, दिनांक १७.०३.२०१७

**शासन आदेश:**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक १ जुलै, २००६ पासून अंमलात आले आहेत. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याला, सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, या कलमाखाली त्याचे अधिकार त्याच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे सोपविता येतील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याचा निर्णय दिनांक ३० मे, २०१५ च्या शासन निर्णयाद्वारे घेण्यात आलेला आहे.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदीस अनुसरून महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ मधील ज्येष्ठ अधिव्याख्याता संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंतीनुसार बदलीचा प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर सादर करण्यात आला होता. नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीस अनुसरून सक्षम प्राधिकाऱ्यांनी व लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या पूर्व मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | बदलीनंतरची पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.विजय बा. भिसे, ज्येष्ठ अधिव्याख्याता, जि.शै.सा.व्या. वि. संस्था, जि. कोल्हापूर | ज्येष्ठ अधिव्याख्याता, जि.शै.सा.व्या.वि. संस्था, जि. बीड | महसूल विभाग वाटप नियम १२ (क) अनुसार आपसी बदलीने. |
| २ | श्री.राजकुमार द. भारती, ज्येष्ठ अधिव्याख्याता, जि. शै. सा. व्या. वि. संस्था, जि. बीड | ज्येष्ठ अधिव्याख्याता, जि.शै.सा.व्या.वि. संस्था, जि. कोल्हापूर | |

२. वर नमूद तत्क्यातील अ. क्र.१ येथे नमूद श्री. विजय बाजीराव भिसे, यांचा महसूली विभाग बदलण्यात येत असून यापुढे ते औरंगाबाद विभागात कार्यरत राहतील तसेच अ.क्र.२ येथे नमूद श्री. राजकुमार द. भारती, यांचा महसूली विभाग बदलण्यात येत असून, यापुढे ते पुणे महसूली विभागात कार्यरत राहतील. सदर महसूली विभागात नियमात नमूद केलेल्या कालावधीनुसार त्यांना राहणे बंधनकारक राहील.

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/ अकरा, दिनांक ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधीत नियंत्रय अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१८०८१३१७२२११४१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.08.14 11:30:28 +05'30'

(र. प्र. आटे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य,पुणे
२) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
३) प्राचार्य / उपसंचालक, प्रादेशिक विद्या प्राधिकरण, औरंगाबाद/ नागपूर/मुंबई
४) विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर
५) प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, बीड/कोल्हापूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/बीड
७) संबंधित अधिकारी ( शिक्षण आयुक्तालयामार्फत )

**प्रत माहितीस्तव**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३) निवडनस्ती, प्रशा-२